“Strengthening of Tertiary Health Care and Medical Education in Maharashtra” या प्रकल्पासाठी शासन स्तरावरील नियंत्रण यंत्रणा म्हणून मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली सुकाणू समिती गठीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,

शासन निर्णय, क्रमांक: एमईडी-२०२१/प्र.क्र.२७ (भाग-अ)/२१/शिक्षण-१

९ वा मजला, गो.ते.रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,

मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.

दिनांक:- ११ मे, २०२३.

**प्रस्तावना:-**

राज्यातील जनतेस वाजवी दरात अतिविशेषोपचार आरोग्य सेवा उपलब्ध करून देण्याचा महाराष्ट्र शासनाचा मानस आहे. यासाठी “Strengthening of Tertiary Health Care and Medical Education in Maharashtra” या प्रकल्पांतर्गत राज्य शासनाने निवडलेल्या जिल्ह्यांतील प्रस्तावित वैद्यकीय महाविद्यालयांचे बांधकाम, कार्यान्वयन व संल्लग्नित रुग्णालयांच्या श्रेणीवर्धनासाठी आशियाई विकास बँकेमार्फत (एडीबी) ५०० मिलीयन डॉलर इतका निधी व इतर तांत्रिक मदत घेण्यात येत आहे.

२. त्यानुसार पुढील प्रकल्पांसाठी आशियाई विकास बँकेचे (एडीबी) सहाय्य अपेक्षित आहे-

अ) जळगाव, सातारा, अलिबाग, सिंधुदुर्ग, उस्मानाबाद, परभणी, रत्नागिरी, अमरावती, गडचिरोली, भंडारा, अंबरनाथ (जिल्हा ठाणे) इत्यादी ठिकाणी १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नविन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित रूग्णालय स्थापन करणे.

आ) सुपर स्पेशालिटी महाविद्यालय व संलग्नित रूग्णालय - सेंट जॉर्ज हॉस्पिटल, मुंबई येथे वैद्यकीय शिक्षण आणि संशोधनासाठी “पोस्ट ग्रॅज्युएट इन्स्टिटट्यूट.”

३. सदर प्रकल्पाच्या अनुषंगाने सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग व आशियाई विकास बँकेचे प्रतिनिधी यांच्यात दि.३०.०१.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत सदर प्रकल्पाशी संबंधित धोरणात्मक बाबींवर निर्णय घेण्याबाबत ठरले आहे. त्यानुषंगाने औषध तपासणी, HMIS प्रणाली, नवीन लेखाशीर्ष उघडणे, वैद्यकीय शिक्षण विभागासाठी भरतीकरिता महाराष्ट्र लोकसेवा आयोगांतर्गत स्वतंत्र कक्षाची स्थापना, पायाभूत सुविधा संनियंत्रणासाठी कक्ष, महात्मा फुले जनआरोग्य योजनेअंतर्गत प्रोत्साहन भत्ता तसेच प्रकल्पासाठी आवश्यक नियंत्रण यंत्रणा इ. विविध धोरणात्मक मुद्दांबाबत करावयाच्या कार्यवाहीच्या अनुषंगाने निर्णय घेण्यात आले.

४. आशियाई विकास बँकेकडून “Strengthening of Tertiary Health Care and Medical Education in Maharashtra” या प्रकल्पासाठी उपलब्ध होणाऱ्या निधीचा वापर योग्यरित्या व्हावा, प्रकल्पांतर्गत निश्चीत केलेल्या धोरणात्मक क्षेत्रांमध्ये अपेक्षित परिणाम साध्य करणे तसेच सदर प्रकल्प नियोजित कालावधीत पूर्ण व्हावा यासाठी शासन स्तरावरील नियंत्रण यंत्रणा म्हणून मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली सुकाणू समिती (Steering Committee) गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

आशियाई विकास बँकेकडून वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाकरिता “Strengthening of Tertiary Health Care and Medical Education in Maharashtra” या प्रकल्पासाठी उपलब्ध होणाऱ्या आर्थिक सहाय्याच्या अनुषंगाने शासन स्तरावरील नियंत्रण यंत्रणा म्हणून मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे सुकाणू समिती (Steering Committee) गठीत करण्यात येत आहे:-

| | | | |
|---|---|---|---|
| १. | मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन | - | अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ३. | सचिव/प्रधान सचिव/ अपर मुख्य सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय | - | सदस्य |
| ४. | सचिव/प्रधान सचिव/ अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ५. | आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई | - | सदस्य सचिव |

२. **सदर समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील -**

I. प्रकल्पाचे अंतिम उद्दिष्ट साध्य करण्यासाठी धोरणात्मक मार्गदर्शन करणे व प्रकल्पाच्या कामकाजावर देखरेख करणे.

II. प्रकल्पाची फलश्रृती आणि परिणाम साध्य करण्याच्या दृष्टीने केलेल्या प्रगतीचा मागोवा घेणे.

III. प्रकल्पांची अंमलबजावणी जलद गतीने व्हावी यासाठी अंमलबजावणी करताना येणाऱ्या समस्यांवर उपाय योजना सुचविणे व त्यानुषंगाने निर्णय प्रक्रिया सुलभ करणे.

IV. प्रकल्पांतर्गत उपक्रमांची अंमलबजावणी विहीत कालावधीत सुनिश्चित करण्यासाठी प्रकल्प व्यवस्थापन समितीला (PMU) मार्गदर्शन करणे.

V. सदर प्रकल्पांतर्गत निश्चीत करण्यात आलेली शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रूग्णालयांच्या बांधकामाकरिता निधी वाटपाबाबत सल्ला देणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा त्याचा संकेतांक २०२३०५१११८२२३७२२१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT TUKARAM SASULKAR

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=09df106c443b4977e7463338fa58f736fdb4fe137863b178345a5ead34dbfb12, pseudonym=8433B0910FFD44AC77C267452786D497C8BC73E0, serialNumber=71214F99804ABAAE1EA28D5F794C1BA337889880D0C567C29D025934340956DF, cn=AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2023.05.11 19:11:24 +05'30'

(अजित सासुलकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राज भवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.विधानसभा अध्यक्ष यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ, मुंबई.
३) मा.विधानपरिषद सभापती यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ, मुंबई.
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई.
७) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई.
८) मा.मंत्री (वै.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
१०) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई
१४) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
१५) सर्व सह सचिव / उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवडनस्ती (शिक्षण-१).